**गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दि.१०.१२.२०२० ते दि. ६.४.२०२१ खंडीत कालावधीतील प्राप्त झालेले दावे निकाली काढण्यासाठी रु. २३.५३ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शेअवि-२०२१/प्र.क्र.५१/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ०१ फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.३१.०८.२०१९.
२) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र. १९३/ ११-अे, दि.१९.९.२०१९.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र.३२/११-अे, दि.८.३.२०२१.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र.३२/११-अे,दि.२४.३.२०२१.
५) कृषि आयुक्तालयाचे आदेश क्र.कृषिआ/सां-९/परि/ प्र.क्र.१७ (ब)/१३१११/२१, दि.७.४.२०२१.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.५१/११-अे, दि. २३.०८.२०२१.
७) संचालक (वि. प्र.) यांचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०२०/प्र.क्र.२५(अ)२०२०/सां.९ /४०७४४ /२०२१, दि.१०.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ मध्ये गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना चालु ठेवण्यासाठी संदर्भाधिन क्र (३) येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून संदर्भाधिन क्र (४) अन्वये सदर योजना राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना सन २०२०-२१ या वर्षासाठी दि.१०.१२.२०२० ते दि.९.१०.२०२१ या कालावधीसाठी लागू करणे आवश्यक होते. तथापि, प्रशासकीय कारणास्तव प्रस्तुत योजना दि.१०.१२.२०२० पासून लागू होवू शकली नाही व ती दि.७.०४.२०२१ पासून सुरु करण्यात आली. कृषि आयुक्तालयाने प्रस्तावित केल्यानुसार गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेअंतर्गत दि.१०.१२.२०२० ते दि. ६.०४.२०२१ या खंडीत कालावधीमध्ये प्राप्त झालेले प्रस्ताव निकाली काढण्यासाठी विशेष बाब म्हणून संदर्भ क्र. (६) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. (७) अन्वये प्राप्त विनंतीस अनुसरुन योजनेच्या अटी व शर्तीनुसार पहिल्या टप्प्यात प्पात्र ठरलेल्या ११८५ प्रस्तावांसाठी (११६८ मृत्यू व १७ अपंगत्व) रु.२३.५३ कोटी इतकी रक्कम गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंअंतर्गत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दि.१०.१२.२०२० ते ०६.०४.२०२१ या (११८ दिवसांच्या) खंडीत कालावधीतील प्राप्त झालेल्या प्रस्तावांपैकी पहिल्या पात्र ठरलेले ११८५ दावे निकाली काढण्यासाठी रु. २३.५३ कोटी इतकी रक्कम सन २०२१-२२ या वर्षासाठी गोपीनाथ

मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रकमेतून वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**मागणी क्र. डी - ३**
**२४०१ पीक संवर्धन**
**(००) (०६) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम)**
**(२४०१ ४४२७) राज्य योजना - ३३ अर्थसहाय्य.**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) व (२) च्या शासन निर्णय/परिपत्रकात नमूद तरतूदीनुसार तसेच योजनेच्या मार्गदर्शक सूचना आणि अटी व शर्तीनुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. सदरचा निधी हा आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या छाणणी समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र. (७) येथील पत्रासोबत प्राप्त यादीतील पात्र शेतकऱ्यांच्या / वारसदाराच्या बँक खात्यात ECS व्दारे उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

६. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक ४२४/का.१४३१,दि.२९.१२.२०२१ व अनौसं.संदर्भ क्रमांक १२/२२/व्यय-१, दि. २०.०१.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२२०२०११७५१४९८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2022.02.01 17:53:44 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी

४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७. सर्व मा.विधानसभा सदस्य
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य
९. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
१०.सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.उप सचिव, (११-अे व २-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१५.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१६.सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
१७.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), मुंबई.
१८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखावअनुज्ञेयता), मुंबई
१९.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), नागपूर
२०.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता),नागपूर
२१.संचालक, लेखावकोषागारे, मुंबई
२२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२४.मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
२५.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२६.सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
२७.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.